# आरसा

## एक कोरियन लोककथा

एलिसन हेड़फ़र

चित्र: जोहाना वान डेर स्टर

मराठी: अश्विनी बर्वे



खूप पूर्वी कोरिया देशातील एका शेतावर एक कुटुंब राहत होते. एक दिवस, हंसू शेतकऱ्याने देशातील सर्व शेतकऱ्यांना एका बैठकीत भाग घेण्यासाठी शहराचा दौरा करण्याचा विचार केला..

जसा हंसू जाण्यासाठी तयार झाला, त्याच्या पत्नीने एक भेटवस्तू मागितली. "मी कधी शहरात गेले नाही, तर तुम्ही माझ्यासाठी शहरातून एक भेटवस्तू  आणाल का?"

हंसूने उत्तर दिले, "नक्कीच, तू सांग तुला काय हवं आहे?"

जिनवॉनने म्हटले, "मला एक सुंदर गोष्ट पाहिजे."





जेव्हा हंसू शहरात पोहचला, तेव्हा त्याची भेट एका व्यापारी महिलेशी झाली आणि तो तिचा दुकानात गेला. हंसूने व्यापाऱ्याला सांगितले, “मला  माझ्या पत्नीसाठी एक सुंदर भेटवस्तू खरेदी करायची आहे.”

“माझ्याजवळ तीच गोष्ट आहे जी आपल्याला पाहिजे,” व्यापाऱ्याने उत्तर दिले,आणि तिने हंसूला एक छान आरसा दिला.

आता त्या वेळी, आरसा खूप दुर्मिळ होता. हंसूने आधी कधी आपला चेहरा आरश्यात बघितला नव्हता. जेव्हा त्याने आपले प्रतिबिंब पाहिले तेव्हा घाबरून गेला. व्यापाऱ्याने हंसूला समजावले की जेव्हा त्याची पत्नी आरश्यात बघेल तेव्हा तिला तिचा चेहरा दिसेल.

घरी परत येऊन, हंसूने ठरवले की तो आरसा लपवून ठेवेल कारण आपल्या पत्नीला भेटवस्तू बद्दल उत्सुकता वाटली पाहिजे. मग नंतर तो तिला आरसा भेट देईल. आणि मग त्या अद्भुत भेटवस्तू आणल्याबद्दल आनंद साजरा करेल. “माझी पत्नी किती खुश होईल.” त्याने आत्मविश्वासाने विचार केला, आणि हंसूने आरसा पडद्याच्या मागे लपवला.

जेव्हा जिनवॉन खोलीत आली, तेव्हा हंसूने तिला भेटवस्तू बद्दल सांगितले आणि त्याने भेटवस्तू लपवून ठेवली आहे. त्याने जिनवॉनकडून वचन घेतले की ती भेटवस्तू शोधण्याचा प्रयत्न करणार नाही.



जसा हंसू खोलीच्या बाहेर गेला. जिनवॉन भेटवस्तू शोधू लागली. शेवटी तिने पडदा बाजूला केला,आणि आरश्यात आपला चेहरा बघितला.

"ईईईईईई..!" ती ओरडली. “मी माझ्या पतीकडे एक सुंदर गोष्ट मागितली होती. आणि माझ्या पतीने एक तरुण महिला घरी आणली.”

“मी एक चांगली पत्नी आहे, मग हंसूला नवीन पत्नी का हवी आहे?” त्याने विचार केला. आणि मग ती रडू लागली. त्यावेळी,तिची आई खोलीत आली.

“बेटा, तू एवढी काळजीत का आहेस?” मिनने विचारले.





जिनवॉन पडद्याकडे घावली आणि तिने बोट दाखवले, “माझ्या पतीने नवीन पत्नी घरी आणली आहे आणि त्याने तिला पडद्याच्या मागे लपवले आहे.” जिनवॉन रडत म्हणाली.

उत्सुकतेने, मिनने पडदा खेचला आणि आरश्यात बघितले.ती हस्त म्हणाली, “बघ पडद्याच्या मागे एका म्हाताऱ्या स्त्री शिवाय कोणीही नाही.!

जिनवॉन एकदा परत रडू लागली, तेव्हा मिनने परत पडद्याच्या मागे बघितले. “पडद्याच्या मागे फक्त एक म्हातारी स्त्री आहे,” तिने घोषणा केली.



तेव्हा जिनवॉनचे वडील खोलीत आले. त्यांनी आवाज ऐकला आणि त्यांना जाणून घ्यायचे होते की त्यांची मुलगी का रडते आहे?

“हा आवाज कशाचा आहे?” क्वानने उत्सुकतेने विचारले.

"ओह, बाबा," जिनवॉन ओरडली, "हंसु एक नवीन बायको घरी घेऊन आला आहे, आणि त्याने तिला पडद्याच्या मागे लपवले आहे.”

“नाही, नाही," मिनने मोठ्याने म्हटले. “पडद्याच्या मागे केवळ एक म्हातारी स्त्री आहे. वाटलं तर तुम्ही स्वतः जाऊन बघा!”

मग मिन पडद्याकडे धावली, आणि तिने पडदा एकीकडे खेचला आणि क्वानने आरश्यात बघितले. तो एवढा उचकला, कारण निःसंदेह त्या आरश्यात एक म्हातारा माणूस दिसला.

“ती न तर एक सुंदर युवती आहे न एक म्हातारी स्त्री आहे,” क्वान ओरडला, “त्यात एक म्हातारा माणूस आहे जो आपल्या घरात लपला आहे!”

जिनवॉनने मागे जाऊन परत एकदा बघितले,पण तिला अजूनही एक सुंदर तरुणी दिसत होती. “तुम्ही दोघेही चुकीचे आहेत”, तिने जोर देऊन म्हटले.

तेव्हा जिनवॉनच्या आईने परत बघितले आणि म्हणाली, “तुमच्या दोघांचे डोळे गेले आहेत का?”

आता परत बघण्याची पाळी क्वानची होती, आणि त्याला अजूनही एक म्हातारा दिसत होता. “तुमच्यापैकी कोणाला माहित नाही की तुम्ही काय बघत आहात? क्वानने म्हटले.



त्यावेळी, जिनवॉनचा मुलगा सू, बाहेर खेळत होता. त्याने विचार केला, “आत सगळेजण का आवाज करत आहेत?” म्हणून तो आत गेला आणि त्याने बघितले की त्याची आई आणि आजी आजोबा सगळे एक दुसऱ्यावर ओरडत होते. “काय झालं असेल बरं?” त्याला आश्चर्य वाटले.

ते लोक पडद्याकडे बोट दाखवत होते आणि मग तिथे डोकावून बघत होते. ते ओरडण्यात एवढे व्यग्र होते की त्यांनी छोट्या सू वर लक्ष दिले नाही. “मला आश्चर्य वाटते की त्या पडद्याच्या मागे काय आहेत ज्यामुळे सगळा परिवार रागावला आहे?” सू ला आश्चर्य वाटले.





सू, त्यावेळी एक कुकी खात होता. तो पडद्याजवळ गेला आणि त्याने हळूच पडदा खेचला. त्याने एक छोटा मुलगा बघितला ज्याच्या हातात कुकी होती. सू ने मुलाला बुक्का मारला आणि त्याला म्हटले, “माझी कुकी मला परत दे.”

आरश्यात बसलेल्या मुलाने पण आपली मुठ मागच्या बाजूला हलवली आणि ते बघून सू रडू लागला.

“काय झालं बाळा,?” सू च्या आईने विचारले.

“पडद्याच्या मागे एक छोटा मुलगा आहे ज्याने माझी कुकी चोरली.” सू रडू लागला.

आता आजी, आजोबा, आई आणि त्याचा मुलगा सगळे परत ओरडू लागले.



“तिथे एक सुंदर मुलगी आहे!” जिनवॉन ओरडली.

“तिथे एक म्हातारी स्त्री आहे!” तिची आई ओरडली.

“तिथे एक म्हातारा माणूस आहे!” त्याचे वडील ओरडले.

“तिथे एक छोटा मुलगा आहे!” सू ने हुंदका घेत म्हटले.

त्यावेळी एक शेजारी बाहेर फिरत होता. जेव्हा त्याने आवाज ऐकला तेव्हा तो घरात आला आणि त्याने विचारले, “काय झालं आहे?”

सू ओरडला, "एक छोट्या मुलाने माझी कुकी चोरण्याचा प्रयत्न करत होता. तो त्या पडद्याच्या मागे लपला आहे.”

शेजाऱ्याने पडद्याजवळ जाऊन तो खेचला तेव्हा त्याला एक मूर्ख माणूस दिसला..

“मी तुला शिकवेन माझ्या मुलासारखी चोरी करू नको,” तो रागावला आणि मग शेजाऱ्याने त्या मुर्खाला पकडून बरोबर नेण्याचा प्रयत्न केला. जेव्हा त्याने असे केले तेव्हा आरसा फरशीवर पडला. हंसूने आवाज ऐकला आणि तो धावत घरात आला. तिथे त्या सुंदर आरश्याचे तुकडे झालेले त्याला दिसले.

“काय झालं?” त्याने विचारले. सगळ्यांनी हंसूला त्या व्यक्तीच्या बाबत सांगितले, जो त्यांना पडद्याच्या मागे लपलेला दिसला. हंसू हसून हसून गडबडा लोळायला लागला. मग त्याने आपल्या पत्नीला त्या अद्भुत आरश्याबाबत सांगितले आणि त्यात कोणीही आपले प्रतिबिंब पाहू शकतो.

“तुला म्हणायचं आहे की तिथे कोणी सुंदर महिला नव्हती? जिनवॉनने विचारले.

“नाही," हंसूने उत्तर दिले, “ तो तुझा प्रेमळ चेहरा होता.”



“तुला म्हणायचं आहे की ती एक म्हातारी स्त्री नव्हती?” मिनने विचारले.

“नाही आई, ती म्हातारी स्त्री तू होती.” हंसू म्हणाला

“याचा अर्थ असा की त्यात म्हातारा माणूस नव्हता? क्वानने विचारले.

“नाही बाबा, तो म्हातारा माणूस तुम्ही स्वतः होते” हंसूने उत्तर दिले.

“जिथे कोणी मुलगा नव्हता, जो माझी कुकी चोरत होता?” सू ने विचारले.

“काय तिथे कोणी बदमाश नव्हता ज्याचा चेहरा मी पाहिला?” शेजाऱ्याने विचारले.

जेव्हा त्या सगळ्यांना जाणीव झाली की ते किती मूर्ख होते, तेव्हा ते सगळे हसू लागले. जिनवॉनने वचन दिले की ती परत कधी भेटवस्तू शोधण्याचा प्रयत्न करणार नाही. पण हंसू फक्त हसला कारण त्याला सत्य माहीत होते.



अंत